<u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती</u>

**श्रीमती अर्चना खेतमाळीस, उप जिल्हाधिकारी, रोहयो, छत्रपती संभाजीनगर यांची उप जिल्हाधिकारी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत...**

## महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र. टिआरएफ-०७२४/प्र.क्र.१९१/भाग-३/ई-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २२ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/ प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४), ४ (५) व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढूण टाकणे) नियम, १९८१ च्या नियम-४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तीना अधीन राहून **श्रीमती अर्चना खेतमाळीस, उप जिल्हाधिकारी** यांची त्यांना वाटप करण्यात आलेला छत्रपती संभाजीनगर विभाग हा संवर्ग कायम ठेवुन **उप जिल्हाधिकारी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई** या पदावर **३ वर्षांच्या कालावधीसाठी** सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने **प्रतिनियुक्तीने नियुक्ती** करण्यात येत आहे.

२. मा. भारत निवडणूक आयोगाच्या निर्देशानुसार राज्यातील आगामी विधानसभा निवडणुक, २०२४ च अनुषंगाने मतदार याद्यांचा विशेष पुर्नरिक्षण कार्यक्रम दिनांक ०६.०८.२०२४ ते ३०.०८.२०२४ या कालावधीत राबविण्यात येत आहे. यास्तव, जे अधिकारी निवडणूक

कामकाजाकरीता अधिसूचित असलेल्या पदावर कार्यरत आहेत, अशा अधिका-यांना कार्यरत पदावरुन मतदार याद्यांचा विशेष संक्षिप्त पुर्नरिक्षण कार्यक्रम संपुष्टात आल्यानंतर (दिनांक ३०.०८.२०२४ नंतर) कार्यमुक्त करण्यात यावे. सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त झाल्यानंतर श्रीमती अर्चना खेतमाळीस, उप जिल्हाधिकारी यांनी प्रतिनियुक्तीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर रुजू होण्यासाठी पुढील सूचनांसाठी प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

३. **उप जिल्हाधिकारी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई** या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्रीमती अर्चना खेतमाळीस, उप जिल्हाधिकारी यांच्या सेवा प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२२२१३५३९६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2024.08.22 21:50:55 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी.
७. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.

९. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
१०.संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
११.संबंधित उप जिल्हाधिकारी (विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांचेमार्फत).
१२.उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३.निवडनस्ती (ई-२).